**राज्य प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान / राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**ग्राम विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः रागांपं-२०१३/ प्र. क्र. १४०/ योजना-४**
बांधकाम भवन, २५, मर्झबान पथ,
फोर्ट, मुंबई-४०० ००१.
दिनांक: ०९ मे, २०१७

वाचा:-

१) **शासन निर्णय क्रमांकः रागांपं-२०१२/ प्र. क्र. ९२/ योजना-४, दिनांक ०३ मार्च, २०१४**
२) **शासन निर्णय क्रमांकः जीपीडीपी-२०१५/ प्र. क्र. ३८/ पं.रा.६, दिनांक ०४ नोव्हेंबर, २०१५**

**प्रस्तावना**

राज्य शासनाने दि.३ मार्च,२०१४ च्या शासन निर्णयान्वये राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियानाची अंमलबजावणी करण्याचा निर्णय घेतला आहे. या अभियानाच्या अंमलबजावणीसाठी राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षाची स्थापना पुणे येथे करण्यात आली असून, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्षांतर्गत क्षेत्रीय स्तरावरील देखरेख व अंमलबजावणीसाठी राज्य प्रकल्प संचालक या पदाची प्रतिनियुक्तीने नियुक्ती करण्यात आली आहे.

१४ व्या वित्त आयोगाच्या निदेशानुसार “आमच गांव, आमचा विकास” या उपक्रमांतर्गत राज्यात ग्रामपंचायत विकास आराखड्यातील उपक्रमांचे नियोजन व अंमलबजावणीच्या अनुषंगाने, देखरेख व संनियत्रंणाचे कार्य राज्य व्यवस्थापन कक्ष, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान या कक्षामार्फत करण्याचा निर्णय दि. ४ नोव्हेंबर,२०१५ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला आहे.

पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांनी सन २०१५-१६ या आर्थिक वर्षापासून “राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान” या योजनेस केंद्र शासनाच्या आर्थिक सहाय्यतेतून वगळण्याचा निर्णय घेतला होता. आता, पंचायती राज मंत्रालय, भारत सरकार यांनी दि.२३ फेब्रुवारी,२०१६ च्या पत्रान्वये “राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान” या योजनेत बदल करुन “राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान” या नावाने सन २०१६-१७ पासून सदर योजना पुन:श्च कार्यान्वित करण्याचा निर्णय घेतला आहे.

राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान / राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान अंतर्गत आर्थिक व प्रशासकीय कामात गतिमानता व सूसुत्रता आणण्यासाठी राज्य प्रकल्प संचालक यांना विभाग प्रमुख म्हणून घोषित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान ही केंद्र पुरस्कृत योजना होती. यामध्ये निधीचा स्त्रोत केंद्र हिस्सा ७५% व राज्य हिस्सा २५% असा होता. आता, ही योजना नव्याने राष्ट्रीय ग्राम स्वराज अभियान या नावाने सुरु करण्यात येणार असून, यामध्ये निधीचा स्त्रोत केंद्र हिस्सा ६०% व राज्य हिस्सा ४०% या प्रमाणात असणार आहे. या योजनेअंतर्गत केंद्र व राज्य शासनाने उपलब्ध करुन दिलेल्या निधीमधून खर्च करण्यासाठी राज्य प्रकल्प संचालक, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान / राष्ट्रीय ग्राम स्वराज्य अभियान, पुणे यांना वित्तीय अधिकार नियम पुस्तिका १९७८ च्या अनुषंगाने वित्त विभाग शासन निर्णय क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दि.१५ मे,२००९ आणि शासन निर्णय क्र.विअप्र-२०१३/प्र.क्र.३०/२०१६/विनियम, भाग-२, दि.१७ एप्रिल,२०१५ मधील भाग क्र. पहिला उप विभाग एक मधील अ.क्र.१ व ३ मधील नियम २ अन्वये विभाग प्रमुख म्हणून घोषीत करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०५०९१२०४१५९४२० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Rajendra Mahadev Gengaje

Digitally signed by Rajendra Mahadev Gengaje
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Rural Development, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=aadac6f62a04dc76f59a0a873d1263c7d14f6ea5080bb750bf392303a1a35907, cn=Rajendra Mahadev Gengaje
Date: 2017.05.09 16:09:52 +05'30'

**रा. म. गेंगजे**
अवर सचिव, महाराष्ट्र शासान

प्रत,

१. मा.मंत्री, (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
२. मा.राज्यमंत्री, (ग्राम विकास) यांचे खाजगी सचिव
३. मा.मुख्य सचिव यांचे सह सचिव, मंत्रालय, मुंबई.
४. मा.अध्यक्ष, जिल्हा परिषद (सर्व)
५. मा.विधान सभा/ विधान परिषद सदस्य (सर्व)

६. अपर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/ सचिव, (नियोजन विभाग, वित्त विभाग, आदिवासी विकास विभाग, सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, माहिती व तंत्रज्ञान (सा.प्र.वि.), महिला व बाल विकास विभाग) मंत्रालय, मुंबई.

७. विभागीय आयुक्त (सर्व)

८. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई

९. महालेखापाल (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई

१०.महालेखापाल (लेखापरिक्षा/ लेखा अनुज्ञेयता) महाराष्ट्र-२, नागपूर

११.मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)

१२.सह सचिव/ उप सचिव ग्राम विकास विभाग, बांधकाम भवन,२५ मर्झबान पथ, फोर्ट, मुंबई-४०० ००१.

१३.उप सचिव (सेवा-६)/ (विनियम), मंत्रालय, मुंबई-४०० ०३२ यांना वित्तीय प्रकाशनामध्ये समाविष्ट करण्याच्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

१४.जिल्हा कोषागार अधिकारी (सर्व)

१५.राज्य प्रकल्प संचालक, राज्य प्रकल्प व्यवस्थापन कक्ष, राजीव गांधी पंचायत सशक्तीकरण अभियान, पुणे.

१६.संचालक, राज्य ग्रामीण विकास संस्था, यशदा, बाणेर रोड, पुणे.

१७.वित्त विभाग (कार्यासन क्र. कोषागारे/विनियम/ अर्थसंकल्प-१७/ व्यय-१५) मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.

१८.नियोजन विभाग (कार्यासन क्र.१४४४), मंत्रालय,मुंबई- ४०० ०३२.

१९. निवडनस्ती (कार्यासन योजना-४)